# महान मुष्ठियोद्धा मुहम्मद अली


लेखक: मायकल बर्गन; चित्रे: ब्रायन बास्कल

मराठी: सुशील मेन्सन




प्रकरण 1

# कॅसियसचा जन्म

मुहम्मद अलीचे मूळ नाव होते *कॅसियस क्ले*. 1942 साली अमेरिकेच्या केंटुकी राज्यातील *लुईव्हिल* शहरात तो जन्मला. दर आठवड्याला, कॅसियस आणि त्याचा भाऊ रुडी याला त्यांची आई रविवारच्या शाळेत घेऊन जाई.




तरुण वयात क्ले खूप चळवळ्या होता. त्याला गप्पा मारायला, फिरायला खूप आवडे.

चल, सिनेमा बघायला जाऊ.

सिनेमा संपल्यावर....

कॅसियस, हे बघ!

कुणीतरी माझी बाईक चोरली.

पोलीस अधिकारी *जो मार्टीन* थियेटरच्या तळघरात मुष्ठियुद्ध (बॉक्सिंग) शिकवतो, हे क्लेला माहीत होते. .

मी चोरांना बदडून काढेन.

मी इथल्या जीममध्ये मुष्ठियुद्ध शिकवतो. तू शिकणार?

आधी लढायचं कसं, हे तर शिक! तेव्हाच तू शत्रुला आव्हान देऊ शकशील.

हो नक्कीच!

क्ले मार्टिनकडून प्रशिक्षण घेऊ लागला. सहा आठवड्यानंतर, क्ले त्याचा पहिलाच सामना जिंकला.

एक दिवस मी जगातील सर्वोत्तम मुष्ठियोद्धा बनेन. त्यावेळी मी तुला नवी कार आणि घर घेऊन देईन.

आधी तू आणखी प्रशिक्षण घे. तुला अजून बराच पल्ला गाठायचाय.

आपली क्षमता वाढवण्यासाठी क्ले मैलोनमैल दौडत असे. आठवड्यातील सहा दिवस तो जिममध्ये व्यायाम करत असे. 17 व्या वर्षापर्यंत त्याने अनेक राष्ट्रीय हौशी स्पर्धा जिंकल्या.

वेगाचा वापर केल्यामुळे मी खूप चपळ झालोय.

पायांची एवढी जलद हालचाल मी कधी पाहिली नाही. त्याचे हातसुद्धा वीजेसारखे चालतात.

1960 साली रोम ऑलिंपिकमध्ये मुष्ठियुद्ध खेळण्यासाठी क्लेची निवड झाली.

मला विमानाचं भय वाटतं.

भयावर मात कर आणि विमानात बस.

मग मी पॅराशूट घालून विमानात बसेन.

रोममध्ये क्लेने पहिल्या तीन लढती जिंकल्या. मग तो सुवर्णपदकासाठी लढला.

मला सुवर्ण पदक मिळालं.

अमेरिकेत परतल्यावर क्लेने आपली एक कविता म्हणून दाखवली.

*अमेरिकाच सर्वोत्तम, हे मनाशी ठरवलं, म्हणूनच मी रशियन आणि पोलीशांना हरवलं आणि अमेरिकेसाठी सुवर्णपदक मिळवलं.*

*एंजेलो डंडी*ला भेटण्याअगोदर क्लेने अनेकांकडे प्रशिक्षण घेतले.

आधीच्या प्रशिक्षकाने हालचाली हळू कर म्हणून सांगितलंय.

नाही कॅसियस, तुझा चपळपणा हेच तर तुझं सर्वात मोठं कौशल्य आहे.

क्ले त्याच्या बढायांसाठी बराच प्रसिद्ध होता.

या उद्दाम माणसाला मी हरवूनच टाकतो.

यासाठीच लोक त्याला *लुईव्हिलचा वाचाळवीर* म्हणतात.

पण तो आपले म्हणणे खरे करत असे. 1964 पर्यंत त्याने 19 लढती जिंकल्या.

मला लिस्टन हवा. मला लिस्टन द्या.

*सन्नी लिस्टन* हा जागतिक मुष्ठियुद्ध विजेता शक्तिशाली होता. 1964 साली क्ले आणि लिस्टन यांच्यात लढत ठरली.

कुरूप माणसा, आठव्या राऊंडमध्ये लोळवतो तुला.

मी तुला दुसऱ्याच राऊंडमध्ये लोळवतो.



क्ले लिस्टनविरुद्ध लढत हरणार, असेच सर्वांना वाटत होते. खुद्द क्लेलासुद्धा जिंकण्याची खात्री वाटत नव्हती.

लिस्टन तर बराच मजबूत दिसतोय!

WHHOMPP!

CCHOMMPP!!

WWHOOOMM!!!

लिस्टन दिसतो तितका मजबूत नाही काही!

सातव्या राऊंडमध्ये...

सहन होत नाहीए. मी माघार घेतो.

मी सर्वोत्तम आहे.

क्ले जगातील सर्वोत्तम मुष्ठियोद्धा बनला.

## प्रकरण 2

# आणखी एक जीत


















1966 साली व्हिएतनाम देशाविरुद्ध सुरू झालेल्या युद्धात अमेरिकी सैन्यात भरती होण्याचा आदेश अलीला मिळाला.

जोवर तुझ्यावर हल्ला होत नाही तोवरच तुझा धर्म युद्धाला विरोध करतो.

हो बरोबर. माझा व्हिएतनामी लोकांशी काही झगडा नाही.

अलीने सैन्यात दाखल होण्यास नकार दिला. त्यामुळे त्याला नापसंत करणारे अमेरिकी लोक चिडले.

भेकडा, तुला तर व्हिएतनाममध्ये लढायला पाठवलंच पाहिजे.

लोकांना एवढा राग का येतोय? कारण मला जे योग्य वाटतंय, तेच मी करतोय.

मला सैन्यात जायचं नाही. हे युद्धच चुकीचं आहे.

मुष्ठियुद्ध हिंसक नाही का?

मुष्ठियुद्ध हा खेळ आहे. त्यात कुणी कुणाचा जीव घेत नाही.

युद्धाला विरोध करणाऱ्या तरुण वर्गाला अली हा नायक वाटू लागला. पण अनेक गोरे तसेच कृष्णवर्णीय यांना अलीची भूमिका पटली नाही.



धार्मिक कारणांमुळे आपल्याला सैन्यात दाखल करू नये, हे कारण अलीने सरकारला दिले. 1967 साली त्याचा हा दावा अमान्य झाला.

REJECTED

28 एप्रिल रोजी अली टेक्सास राज्यातील ह्युस्टन या सैन्यतळावर हजर झाला.

तुम्ही सगळे अमेरिकी सैन्यात दाखल होणार आहात. तुमचं नाव पुकारल्यावर पुढे या.

कॅसियस मार्सेलस क्ले.

सैन्यात भरती व्हायला नकार दिल्यामुळे अलीला अटक झाली.

हे नाव माझं नाही. मी पुढे जाणार नाही.

युद्धात लढण्यापेक्षा मी जेलमध्ये जाईन. हे युद्ध चुकीचं आहे.

सैन्यात दाखल होण्यास नकार दिल्याने अलीचे खूप नुकसान झाले.

न्यूयॉर्क राज्य मुष्ठियुद्ध आयोगाने तुझा मुष्ठियुद्धाचा परवाना आणि सर्वोत्तम दर्जा काढून घेतलाय.

त्याने माझं काहीच बिघडत नाही, एंजलो. माझा धर्म मुष्ठियुद्धापेक्षा जास्त महत्त्वाचा आहे.

सर्व राज्यांनी अलीच्या मुष्ठियुद्धावर निर्बंध घातले. काही क्रीडापत्रकारांनी आणि राजकारण्यांनी अलीला देशद्रोही ठरवले. पण *मार्टिन ल्यूथर किंग ज्यूनिअर* याने अलीचे समर्थन केले.

आपल्या तत्वांसाठी त्याने प्रसिद्धी, पैसा या सगळ्यांवर पाणी सोडलं.

20 जून 1967 रोजी, सैन्यात दाखल होण्यास नकार दिल्यावरून न्यायाधिशांनी अलीला सजा सुनावली.

पाच वर्ष तुरुंगवास आणि 10,000 डॉलर दंड.



अलीच्या वकिलांनी या निर्णयाविरुद्ध दावा दाखल केला. यादरम्यान, अलीने प्रसिद्ध मुष्ठियोद्धा *रॉकी मर्सियानो*सोबत एक सिनेमा बनवला.

ही काही खरीखुरी लढत नाही.

पण या रिंगणात पाय ठेवल्यावर छान वाटतं!

1970 पर्यंत, अमेरिकेत व्हिएतनाम युद्धाच्या विरोधी सूर उमटू लागले. अलीबाबतही लोकांचे मत बदलू लागले.

जॉर्जिया राज्याने तुला मुष्ठियुद्धाची परवानगी दिलीय.

26 ऑक्टोबर 1970 रोजी अलीने *जेरी क्वारी*विरुद्ध लढत जिंकली. अमेरिकी सुप्रीम कोर्टाने अलीवरचा खटला काढून घेतला.

मी अजूनही उत्तम खेळतोय. मी पुन्हा सर्वोत्तम मुष्ठियोद्धा

## प्रकरण 3

# हार आणि जीत

त्यावेळी *जो फ्रेझीयर* हा जगातील सर्वोत्तम मुष्ठियोद्धा होता. त्याची आणि अलीची लढत ठरली. अली पुन्हा मुष्ठियुद्धात पारंगत झाला.

तुम्हाला कदाचित खरं वाटणार नाही, मी फ्रेझीयरला संपवून टाकेन.

मुष्ठियुद्धापासून दूर असताना अलीने आपल्या शैलीत बदल केला. त्याचे डॉक्टर, *फर्डी पचेको*नुसार अलीचे शरीर पहिल्यासारखे राहिले नव्हते.

माझ्या काही ठोशांतच फ्रेझीयरचा खेळ संपून जाईल.

तुला काय वाटतं, *फर्डी*?

तो मजबूत आहे पण धीमा आहे. त्याचे हात खूप मऊ झालेयत.

सावध राहा, मुहम्मद. तुला वर्मी मार लागू शकतो.



मार्च 8, 1971 रोजी न्यूयॉर्कमध्ये अली आणि फ्रेझीयर यांच्यात लढत झाली. दोघांनी त्यापूर्वी कुठल्याही लढतीत हार पत्करली नव्हती.




पण 11 व्या राऊंडमध्ये....

मग 15व्या राऊंडमध्ये....




10 वर्षांत पहिल्यांदाच अली हरला. पुढच्याच दिवशी त्याने पत्रकारांशी गप्पा मारल्या.



पुढच्या दोन वर्षात अलीने 10 लढती सहजपणे जिंकल्या. या लढतींतील बरेचसे प्रतिस्पर्धी मोठे मुष्ठियोद्धा नव्हते. पण 1973 साली अली *केन नॉर्टन* या मुष्ठियोद्ध्याविरुद्ध लढला. दुसऱ्या राऊंडमध्ये....




1974 साली अली पुन्हा जो फ्रेझीयरविरुद्ध लढला. त्यावेळी फ्रेझीयर सर्वोत्तम नव्हता. पण अलीला त्याचा बदला घ्यायचा होता.

सर्वानुमते, अलीला विजेता ठरवण्यात आले.

पण ही काही मोठी लढत नव्हती, त्यांच्या पहिल्या लढतीसारखी!



यानंतर *जॉर्ज फोरमन*विरुद्ध लढण्यासाठी अलीने प्रशिक्षण घेतले. *जंगलातील गडगडाट* म्हटली गेलेली ही लढत आफ्रिकेतील झैरे देशात झाली. आफ्रिकेतील लोकांनी अलीचा खेळ बारकाईने पाहिला.

तू फोरमनला कसं हाताळशील? तो तरूण आणि बळकट आहे.

भुंग्यासारखं घुमत राहा, मधमाशीसारखा दंश कर, त्याचे डोळे जे पाहू शकत नाही, त्याला तो मारू शकत नाही.

अलीने मुष्ठियुद्धाचा *रोप-अ-डोप* डावपेच वापरला.




1 ऑक्टोबर 1975 रोजी फिलिपिन्समधील मनिला येथे अली आणि फ्रेझीयर यांच्यात लढत झाली. या लढतीला *मनिलातील थ्रीलर* म्हटले गेले.


ROUND 3
ROUND 7
ROUN 11
14व्या राउंडमध्ये त्यांनी एकमेकांना बरेच ठोसे मारले.


बस एंजेलो, माझे ग्लोव्हज काढ. मी आणखी लढू शकत नाही.
सोड ना! तू नक्की जिंकशील बघ.
त्याची गरज नाही. फ्रेझीयरने माघार घेतलीय.


पुढची दोन वर्षे अलीने आपले सर्वोत्तम स्थान कायम राखले. पण रिंगणाच्या बाहेर काही वेगळेच घडत होते.
सकाळी उठल्याउठल्या माझ्या हाताला मुंग्या येतात.
आणि बोलताना तू चाचरतोससुद्धा!


रिंगणातही लोकांना अलीतील बदल लक्षात आला.
एव्हाना अलीने प्रतिस्पर्ध्याला संपवायला हवं होतं.
अलीचं वय होत चाललंय.


15 फेब्रुवारी 1978 रोजी खास प्रशिक्षण न घेताच अली *लिओन स्पिंक्स*शी लढला.
पण त्याला याची किंमत चुकवावी लागली.
PPPOOOMMM!!

पुढच्याच सकाळी अली पुन्हा लढण्यासाठी मेहनत करू लागला.

मला पुन्हा सर्वोत्तम मुष्ठियोद्धा बनायचंय.

सात महिन्यांनंतर, अली आणि स्पिंक्स यांच्यातील लढत पाहाण्यासाठी तब्बल 63,000 लोक जमले. बरेच लोक अलीला पाठिंबा देत होते.

15 राऊंडनंतर....

आणि विजेता आहे, याआधी तीनदा सर्वोत्तम ठरलेला मुष्ठियोद्धा!

या लढतीनंतर अली मुष्ठियुद्ध खेळातून निवृत्त झाला.

पण 1980 साली अली नवा सर्वोत्तम मुष्ठियोद्धा *लॅरी होम्स*विरुद्ध लढायला पुन्हा रिंगणात उतरला.

होम्सशी कसं लढायचं, एका हाताने की दोन्ही हातांनी?

अली तेव्हा 38 वर्षांचा होता. होम्स तरूण आणि चपळ होता. अली होम्सला हरवू शकला नाही. 11 राऊंडनंतर....

बघ मुहम्मद, तू आता थकलायस, पूर्वीसारखा लढू शकत नाहीस.

11 डिसेंबर 1981 रोजी अली *ट्रेवर बर्बिक*शी झालेली लढत हरला. त्याने निवृत्त होत असल्याचे जाहीर केले.

पुन्हा लढायची इच्छा आहे का मुहम्मद?

माझी कारकिर्द आता संपलीय, हे मी मान्य करायला हवं.

यावेळी मात्र अलीने आपला शब्द पाळला. तो पुन्हा कधीही मुष्ठियुद्ध खेळला नाही.

प्रकरण 4

# जगातील सर्वोत्तम

निवृत्तीनंतरही एक खेळाडू म्हणून अलीची लोकप्रियता कायम राहीली. त्याने गरीबांसाठी देणग्या गोळा केल्या. त्याला बऱ्याच संकटांनाही तोंड द्यावे लागले.

अजूनही बोलताना मी चाचरतो आणि माझे हात थरथरतात.

तुला पार्किंसन्स आजार झालाय. औषधामुळे तुला बरं वाटेल. पण हा आजार बरा होऊ शकत नाही.

मुष्ठियुद्धामुळे मला हा आजार झाला का?

नाही, पार्किंसन्स कुणालाही होऊ शकतो.

त्याला पैशाची अडचणही जाणवली.

तू लाखो डॉलर कमावलेस, ते कुठे गेले?

गरजू लोकांना मी पैसे द्यायचो.

बरं, आता तुझ्याकडे फार काही शिल्लकही नाही.



1986 साली अलीने लुईव्हिलमधील एक परिचित स्त्री *लोनी विल्यम्स*शी लग्न केले आणि त्याच्या आयुष्याला एक चांगले वळण मिळाले.

एवढी मेहनत घेऊ नकोस, मुहम्मद. काळजी घे स्वत:ची.

या आजाराला माझ्यावर स्वार होऊ देणार नाही मी, लोनी.

FAN MAIL

1990 च्या सुमारास, अलीची तब्येत अधिकच बिघडली. तो क्वचितच बोलत असे. पण आपल्या चाहत्यांना मात्र तो वेळ देत असे.

अली खूप धार्मिकही झाला. त्याने आजन्म मुस्लिम धर्माचे पालन केले.

धन्यवाद, चॅम्प!

तो दिवसातून पाचवेळा प्रार्थना करत असे आणि पवित्र कुराण वाचत असे.

इतराना मदत करण्यासाठी अली जगभर भटकला. 1990 साली अलीने इराकी सरकारला त्यांनी ओलीस ठेवलेल्या अमेरिकी लोकांची सुटका करण्यास राजी केले.

आमची सुटका होण्यासाठी मदत केल्याबद्दल आभार मुहम्मद. काय करू तुमच्यासाठी?

तुम्ही सुरक्षित आहात, हेच माझ्यासाठी पुरेसं आहे.

1996 साली जॉर्जिया राज्यातील अटलांटा शहरात होणाऱ्या उन्हाळी ऑलिंपिकची ज्योत पेटवण्याचा मान अलीला मिळाला.

मी हे नाही करू शकत. मला पार्किंसन्स आहे.

तिथे लोक तुझ्या कारकिर्दिसाठी तुला मानवंदना देतील.

ज्योत कोण पेटवणार, हे लोकांना माहीत नव्हते. अचानक हातात मशाल धरलेल्या अलीने मैदानात प्रवेश करताच लोक बेभान होऊन टाळ्या वाजवू लागले.

2002 साली युनोने अलीला *शांतीचा दूत म्हणून* अफगाणिस्तानला पाठवले. पण आजारामुळे तो नीट बोलू शकला नाही.

अली यांच्याकडून आलेला हा संदेश मी वाचून दाखवते.

तुम्ही अफगाणिस्तानचा आत्मा आहात....

आजारपणातही अलीने वर्षातून 200 दिवस भटकंती केली. देणगी म्हणून आपल्या कलाकृती आणि सह्या दान केल्या.

कसलं चित्र काढतोयस?

हा फ्रेझीयर आणि हा मी!

आता कुठे माझं आयुष्य सुरू झालंय.

आपल्या मुष्ठियुद्धाच्या कौशल्यामुळे अली जगप्रसिद्ध झाला. त्याला लोकांना खुश करायला, त्यांचा विश्वास जिंकायला आवडत असे. लोकांसाठी तो नेहमीच एक महान खेळाडू राहिला.

# मुहम्मद अली

- मुहम्मद अलीचे मूळ नाव कॅसियस क्ले होते. त्याचा जन्म 17 जानेवारी 1942 साली झाला. इ.स. 622 साली मुहम्मद नावाच्या व्यक्तिने इस्लाम धर्माची स्थापना केली होती.
- मुहम्मद नावाचा अर्थ आहे, "कौतुकास्पद" तर अली हे एका नेत्याचे नाव होते, त्याचा अर्थ आहे, "सर्वोच्च".
- मुष्ठियुद्धातील *रोप-अ-डोप* या डावपेचासोबत अलीने *अली शफल* नावाचा एक डावपेच शोधला. यात पावले जलद पुढे-मागे करून तो प्रतिस्पर्ध्याला गोंधळात टाकत असे.
- त्याच्या कारकिर्दीत अली 56 वेळा जिंकला आणि 5 वेळा हरला. 37 लढतींमध्ये त्याने प्रतिस्पर्ध्याला केवळ एकाच ठोश्यात गारद केले.
- अलीला नऊ मुले झाली. त्याची मुलगी *लैला* हीदेखील एक मुष्ठियोद्धा आहे.
- मुष्ठियुद्धामध्ये खेळाडुच्या वजनानुसार गट असतात. लाईटवेट प्रकारात 48 किलोपेक्षा कमी वजनाचे तर हेवीवेट प्रकारात 86 किलोपेक्षा जास्त वजनाचे खेळाडू असतात.
- अलीला वेगवेगळे डावपेच आखायला खूप आवडत असे. पण नंतर तो त्यांमागचे गुपीत उघड करत असे. डावपेच खेळून कुणाला फसवू नये, अशी मुस्लिम लोकांची श्रद्धा आहे.
- आज डॉक्टर मानतात की अलीला झालेला पार्किंसन्स ही विकृती नसून आजार आहे. हा आजार बरा होऊ शकत नाही. औषधे आजारी व्यक्तिच्या फक्त अवयवांची थरथर कमी करू शकतात.
- 2003 साली अलीविषयी *गोट* (GOAT – Greatest Of All Time) नावाचे पुस्तक प्रकाशित झाले. त्याच्या फक्त 10,000 प्रती छापण्यात आल्या होत्या. प्रत्येक पुस्तकाचे वजन 34 किलो होते आणि त्यावर अलीची स्वाक्षरी होती. पुस्तकाच्या काही प्रतींची विक्री 12,500 डॉलरना झाली.
- 2005 साली केंटुकी राज्यातील लुईव्हिल शहरात *मुहम्मद अली केंद्र* स्थापन करण्यात आले. तिथे सन्मापूर्वक जगण्यासाठी आणि आशावादी राहाण्यासाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबवले जातात.
- 2005 साली अध्यक्ष *जॉर्ज बुश* यांनी अलीला *प्रेसिडेंशीयल मेडल ऑफ फ्रिडम* हा अमेरिकेचा सर्वोच्च नागरी पुरस्कार प्रदान केला.



**समाप्त**